श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील, निलंबनाधिन मोटार वाहन निरीक्षक यांना शासन सेवेत पुनःस्थापित केल्यानंतर पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**आदेश क्रमांक: एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.११४/परि-३**

२ रा मजला,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक : २८ मे, २०२५.**

वाचा : १) गृह विभाग, शासन आदेश क्रमांक: एमव्हीडी-०६२४/प्र.क्र.१२८/परि-३, दि. २३.०७.२०२४.
२) गृह विभाग, शासन ज्ञापन क्रमांक: एमव्हीडी-०६२४/प्र.क्र.१२८/परि-३, दि. ०४.१०.२०२४.

### आदेश

ज्याअर्थी, श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील, मोटार वाहन निरीक्षक, उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, वाशिम (तत्कालिन सहायक मोटार वाहन निरीक्षक, प्रादेशिक परिवहन कार्यालय, अमरावती) यांच्याविरुध्द परराज्यातील वाहनांची बनावट पध्दतीने नोंदणी केल्याप्रकरणी एपीएमसी पोलिस ठाणे, नवी मुंबई येथे भा.दं.वि.सं. कलम ४२०, ४६५, ४६७, ४६८, ४७१, ४१३, ४०१, २०१, १२० (ब), ४०९, १०९ अन्वये गु.र.क्र. ७२/२०२४ दिनांक ०७.०३.२०२४ गुन्हा दाखल करण्यात आला आहे. श्रीमती भाग्यश्री पाटील यांना दिनांक ३०.०४.२०२४ रोजी अटक करण्यात आली होती. मा. प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी, बेलापूर, नवी मुंबई दिनांक १०.०५.२०२४ रोजी जामीन मंजूर केला आहे. त्यांना झालेल्या अटकेचा कालावधी ४८ तासांहून अधिक असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ चा भाग-दोन नियम ४ (२) (अ) च्या तरतूदीनुसार त्यांना दिनांक २३.०७.२०२४ च्या शासन आदेशान्वये निलंबित करण्यात आले आहे;

आणि ज्याअर्थी, श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील (निलंबित), मोटार वाहन निरीक्षक यांच्याविरुध्द शासन ज्ञापन दिनांक ०४.१०.२०२४ अन्वये विभागीय चौकशी सुरु करण्यात आली आहे;

आणि ज्याअर्थी, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १४.१०.२०११ व दिनांक ०९.०७.२०१९ मधील तरतुदीनुसार श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील (निलंबित) मोटार वाहन निरीक्षक यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यात आला. निलंबन आढावा समितीने केलेल्या शिफारशीनुसार श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील (निलंबित), मोटार वाहन निरीक्षक यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे;

त्याअर्थी श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील, निलंबनाधिन मोटार वाहन निरीक्षक यांना या आदेशान्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत असून त्यांना प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगांव येथे अकार्यकारी स्वरुपाची कामे असलेल्या रिक्त पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१४३९१७९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYSEN JAYPRAKASH INGOLE

Digitally signed by JAYSEN JAYPRAKASH INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=fac1868a3a3bc62404072a90fb604cfa54cc0c6b396bbe9f862cb814602e0bfd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C9E48AC69F313DEECCD6E9EECEEA57A822C9D8CCACD64DD1C5031B045E7C1F2, cn=JAYSEN JAYPRAKASH INGOLE
Date: 2025.05.28 16:07:52 +05'30'

**(जयसेन इंगोले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता अग्रेषित. (दोन जादा प्रतींसह)
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३) उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, वाशिम.
४) प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन कार्यालय,जळगाव.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव.
६) श्रीमती भाग्यश्री भगवान पाटील, मोटार वाहन निरीक्षक (परिवहन आयुक्त यांच्यामार्फत)
७) निवडनस्ती, परि-३.